**सन २०१८-१९ मध्ये परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेंतर्गत शिक्षक व शिक्षकेतर (प्राथमिक) कर्मचाऱ्यांकरिता अंशदान परतावा रक्कम वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अंनियो- ३४१८/प्र.क्र.३१/टिएनटी - ६**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: २२ ऑक्टोबर, २०१८

वाचा -

१. शासन निर्णय वित्त विभाग क्र.अंनियो-१००९/प्र.क्र.१/सेवा-४, दिनांक १२/११/२०१०.
२. शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.अंनियो-१००६/(२३/०६) माशि-२, दिनांक २९/११/२०१०.
३. शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.संकीर्ण २४१३/(८५/१३)अर्थसंकल्प, दिनांक १३/०७/२०१७.
४. शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.अंनियो-३४१६/प्र.क्र.८६/१६/टीएनटी-६, दिनांक २०/१२/२०१७.

**प्रस्तावना -**

जिल्हा परिषदा मान्यताप्राप्त खाजगी अनुदानित प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक व अध्यापक विद्यालयातील १००% अनुदानित पदावरील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांसाठी परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजनेची कार्यपध्दती संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये विशद केली आहे. नवीन "परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेच्या" अंशदानाच्या रकमा परत करण्याबाबतची कार्यपध्दती संदर्भ क्र. ३ च्या शासन निर्णयान्वये विशद केली आहे. सदर योजनेसाठी सन २०१८-१९ मध्ये परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेंतर्गत शिक्षक व शिक्षकेतर (प्राथमिक) कर्मचाऱ्यांकरिता अंशदान परतावा रक्कम वितरीत करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेंतर्गत शिक्षक व शिक्षकेतर (प्राथमिक) कर्मचाऱ्यांकरिता अंशदान परतावा करण्यासाठी रू. ५,४७.६९ लाख इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (BEAMS) द्वारे आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना पुढील विवरणपत्रानुसार वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रु.लाखात)

| अ. क्र. | योजनेचे नाव व लेखाशीर्ष मागणी क्रमांक | वितरीत करण्यात येत असलेला निधी सन २०१८-१९ |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | ८३४२ इतर ठेवी, ११७ शासकीय कर्मचाऱ्यांकरिता परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजना, (०४)(०६) जिल्हा परिषदेकडील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांना परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेंतर्गत परतावा (८३४२ ०१६८) | ५,००.०० |
| २ | ८३४२ इतर ठेवी, ११७ शासकीय कर्मचाऱ्यांकरिता परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजना, (०४)(०७) मान्यताप्राप्त व अनुदानित प्राथमिक शाळेतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांना परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेंतर्गत परतावा (८३४२ ०१७७) | ४७.६९ |
| | **एकूण** | ५,४७.६९ |

२. सदर खर्च सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या संबंधित लेखाशीर्षाच्या तरतूदीतून भागवावा, तसेच मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

३. या शासन निर्णयात मंजूर केलेली अनुदाने संदर्भ क्र.१ व ३ येथील शासन निर्णयातील अटी व शर्तींच्या अधीन आहेत. उपलब्ध करुन देण्यात येत असलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व अनौपचारिक संदर्भ क्र.७२९/२०१८/व्यय-५, दिनांक १८/०९/२०१८ व शासन निर्णय क्र.अंनियो-१००६/(२३/०६) माशि-२, दिनांक २९/११/२०१० व शासन निर्णय क्र.अंनियो-३४१६/प्र.क्र.८६/१६ /टीएनटी-६, दिनांक २०/१२/२०१७ मधील अटी व शर्तींच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०२२१५४९१९०५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Charushila Devendra Chaudhari

Digitally signed by Charushila Devendra Chaudhari
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b9523537dcc1d46bc807768647a9ed4ff3816ecf3, cn=Charushila Devendra Chaudhari
Date: 2018.10.23 16:57:06 +05'30'

**( चारुशीला चौधरी )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) प्रधान सचिव (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,

२) आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र शासन, पुणे,

३) संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक)महाराष्ट्र राज्य, पुणे,

४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र (१/२), मुंबई/नागपूर,

५) महालेखापाल (लेखा परिक्षा), १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,

६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/नागपूर,

७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

८) वित्त विभाग (व्यय-५/अर्थसंकल्प-८), मंत्रालय, मुंबई,

९) कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी मंजूर रक्कम बी.डी.एस.प्रणालीवर तात्काळ उपलब्ध करुन द्यावी.

१०) निवडनस्ती (टिएनटी-६).